इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेतील पदवीपूर्व श्रेणीवर्धनातंर्गत निवासी वसतीगृहावरील दुस-या, तिस-या व चौथ्या मजल्याचे बांधकाम अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : आयसीएन-२०२२/प्र.क्र.३७३/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : १६ मार्च, २०२३

वाचा :
१) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक : संवैशिवसं/ इंगाशावैमना/निवैअधिवससदुसरातिसराचौथामजाबांध/३१२५/आय-प/२२,दिनांक ०९.१२.२०२२
२) कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग,पत्र क्र.बैठक-२०२३/प्र.क्र.१४/इमा-१, दिनांक ०१.०३.२०२३

शासन निर्णय :

विभागाच्या अधिपत्याखालील इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेतील पदव्युत्तर विद्यार्थी संख्येत झालेली वाढ असल्याने राष्ट्रीय वैद्यकीय आयोगाच्या मानंकाची पुर्तता करणे तसेच आंतरवासीय वसतीगृहाची त्रुटीची पुर्तता करण्यासाठी पदवीपूर्व श्रेणीवर्धनांतर्गत निवासी वैद्यकीय अधिकारी वसतीगृहावरील दुस-या, तिस-या व चौथ्या मजल्याचे बांधकाम करण्यासाठी मा.उच्चस्तरीय सचिव समितीने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने रुपये २२,६८,९६,३७६/- (रुपये बावीस कोटी, अडुसष्ठ लक्ष, शहाण्णव हजार, तीनशे शहात्तर मात्र) इतक्या रक्कमेच्या बांधकाम अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अदांजित किंमत |
|---|---|---|
| १ | Construction of 2nd, 3rd and 4th Floor on Resident Medical Officer's Hostel Building at I.G.G.M.C.H.Nagpur | २२,६८,९६,३७६ |

अटी :-

१) सदर काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत पुर्तता करण्यात यावी.

२) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

३) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक - २०१७/प्र.क्र११/नियोजन-३,दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

७) इमारतीमध्ये दिव्यांगाकरीता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८) विषयांकित काम संस्थेत अस्तित्वातील G + १ इमारतीवर अतिरिक्त ३ मजल्याच्या बांधकामाचे अंदाजपत्रक सादर करण्यात आलेले असल्याने अतिरिक्त ३ मजल्याचे बांधकाम याबाबत Structural Audit करुन बांधकाम करण्यात यावे.

९) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. प्रस्तुत बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणा-या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-०८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २४.०२.२०२३ रोजी आयोजित उच्चाधिकार समितीच्या बैठकीत प्राप्त सहमती व त्यानुषंगाने प्राप्त इतिवृत्तानुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२११२४५५५३५१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2023.03.21 13:31:42 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
२. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर

३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
७. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर
९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
१०.अधिष्ठाता, इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर.
११.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१२.निवडनस्ती (प्रशा-१).